(११)

२०११०३१०१६००५५००१

<u>सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका</u>
महानगरपालिका क्षेत्रातील देशाबाहेर मालाची निर्यात करणाऱ्या उद्योगांना जकात माफी देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.सांमपा ३००७/७२४/प्र.क्र. १४४ /नवि २२,**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,**
**दिनांक :- २१ मे, २००७.**

**वाचा :** १) शासन निर्णय, क्र.एसएमसी १०२००४/१२९२/प्र.क्र.२७१/०२/नवि २४, दिनांक १६ सप्टेंबर, २००५,
२) शासन निर्णय क्र.सांमपा ३००६/१०८९/प्र.क्र.१९१/०६/नवि २२, दिनांक २७ जून, २००६,
३) आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर मनपा यांचे पत्र क्र.मनपा/सां.१३/जकावि/६२०/२००६-०७, दिनांक १७.३.२००७ चे पत्र व त्यासोबतचा मनपा ठराव क्र.२४२, दिनांक २८.२.२००७.

**<u>प्रस्तावना :-</u>**

सांगली मिरज आणि कुपवाड महानगरपालिका क्षेत्रातील तीनही औद्योगिक वसाहतीमधील उद्योजकांना / उद्योगांना संदर्भाधिन क्र.१ व २ येथे नमुद शासन निर्णयान्वये त्यांच्या व्यवसायासाठी आयात होणारा कच्चा माल व यंत्र सामुग्री यावरील जकातीच्या दरांच्या ५०% इतकी सवलत १० वर्षे किंवा औद्योगिक नगरी अस्तित्वात येईल, या पैकी जे अगोदर होईल त्या कालावधीसाठी देण्यात आली आहे. आता सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिकेने, महानगरपालिका क्षेत्रातील (१) वसंतदादा औद्योगिक वसाहत, सांगली, (२) गोविंदराव मराठे सहकारी औद्योगिक वसाहत, मिरज, (३) एम.आय.डी.सी., मिरज या तिन्ही औद्योगिक वसाहतीत देशाबाहेर मालाची निर्यात करणारे निर्यातदार उद्योजक आहेत. त्यांचा व्यवसायामध्ये नावलौकीक राहण्यासाठी, त्यांच्या मालाचा दर्जा व गुणवत्ता जागतिक पातळीवर टिकून राहण्यासाठी, तसेच जगातील बाजार पेठेतील उत्पादनाशी स्पर्धा करुन बाजारपेठेत टिकाव धरुन राहण्यासाठी, त्यांच्या व्यवसायासाठी आवश्यक कच्च्या मालाची यादी जिल्हा उद्योग केंद्राकडून प्रमाणित करुन त्यांमध्ये समावेश केलेल्या कच्च्या मालास व जॉबवर्क करण्यासाठी बाहेरुन येणाऱ्या सर्व माल, तसेच यंत्रसामुग्री यांस पूर्णत: जकात माफी देण्याचा प्रस्ताव आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांनी ( मनपा ठराव क्र.२४२, दिनांक २८.२.२००७ यांसह ) मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

...२

**शासन निर्णय :**

सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका क्षेत्रातील (१) वसंतदादा औद्योगिक वसाहत, सांगली, (२) गोविंदराव मराठे सहकारी औद्योगिक वसाहत, मिरज, (३) एम.आय.डी.सी., मिरज या तिन्ही औद्योगिक वसाहतीमधील देशाबाहेर उत्पादित मालाची निर्यात करणाऱ्या निर्यातदार उद्योगांना / उद्योजकांना त्यांचे व्यवसायांसाठी लागणाऱ्या कच्चा माल व यंत्रसामुग्री यांवर तसेच जॉब वर्कसाठी येणारे सर्व मटेरियल व यंत्रसामुग्री या बाबींवर जकात करापासून पूर्णत: सूट देण्यास खालील अटींवर मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम १४९ (५) व ४५५ (२) अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) सदरील सूट ही १० वर्षे किंवा औद्योगिक नगरी अस्तित्वात येईपर्यंत यापैकी जे अगोदर होईल त्या कालावधीपर्यन्त देण्यात येईल.

२) महानगरपालिका क्षेत्रातील मालमत्ता कर व पाणीपट्टी करांचे सुसूत्रीकरण करुन सक्षमपणे वसूली करण्यात येईल.

३) महानगरपालिकेचे इतर स्त्रोतांचे उत्पन्न वाढविण्यावर सक्षमपणे भर देण्यात येईल.

४) त्यांच्या व्यवसायासाठी आवश्यक कच्च्या मालाची यादी जिल्हा उद्योग केंद्राकडून प्रमाणित करण्यात येईल.

०२. सदर जकात सवलती अनुषंगाने सांगली, मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिकेच्या जकात नियमावलीच्या अनुसूची-१ मधील बदलाची सुधारणा आयुक्तांनी तात्काळ राजपत्रात प्रसिध्द करावी. तसेच सदर जकात सवलत या मंजूरी आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या कालावधीनंतर म्हणजेच दिनांक- २१/६/२००७ रोजी पासून अंमलात येईल.

०४. आयुक्त, सांगली, मिरज आणि कुपावाड शहर महानगरपालिका यांनी याबाबतची सर्व संविधानिक बाबींची पूर्तता करुन अनुपालन अहवाल शासनास पाठवावा.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,**

२१/५/०

( सुनिल कोठेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
२) प्रधान सचिव, नगर विकास यांचे स्वीय सहाय्यक,
३) आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली
४) निवड नस्ती, नवि-२२.

------